कारागृह विभाग, पूर्व विभाग, नागपूर यांचे खुद्द कार्यालय व अधिनस्त कारागृंहाकरिता करण्यात आलेल्या संगणक उपकरण खरेदी खर्चास कार्योत्तर मान्यता देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. जेएलएम०२२४/प्र.क्र.३३/तुरुंग-२.**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १५.३.२०२४.

**वाचा-**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. इप्रवि/मेंन्टेनंन्स/नागपूर/देयक/प्र.मा/३३५/२०२३-२४/क-६, पुणे, दिनांक ११.१.२०२४ रोजीचे पत्र.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/८२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५.

**प्रस्तावना-**

विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), पूर्व विभाग, नागपूर यांच्या स्तरावरील खरेदी समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये संगणक व प्रिंटर खरेदीबाबत विधी व न्याय विभागाअंतर्गत मा. प्रमुख जिल्हा न्यायाधीश, पुणे यांचे खरेदी आदेशाच्या मूळ पुरवठा आदेशामधील नमूद अटी व शर्ती आणि उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक १.१२.२०१६ मधील नियम क्र.३.३.२ अन्वये पुनर्प्रत्ययी आदेशाच्या अटीनुसार संगणक पुरवठा करण्याकरिता Ms Cybernet IT Private Ltd, Shivajinagar, Pune यांना रु.४९,७४,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेचे दिनांक १५.७.२०२३ रोजीचे खरेदी आदेश निर्गमित करण्यात आले व सदर संगणकीय उपकरणांचा विहीत कालावधीत पुरवठा केलेला आहे. वित्तीय अधिकार नियम, १९७८ भाग पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र.२७ (अ) नियम ७६ नुसार उक्त खरेदी देयकांबाबतचा खर्च १७- संगणक खर्च, या उद्दिष्टाखाली खर्ची टाकून प्रशासकीय विभागाचे मंजूरी आदेश सादर करण्याबाबत कोषागार कार्यालय, नागपूर यांनी आक्षेप नोंदविला आहे. त्यानुषंगाने उक्त खरेदी खर्चास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

कारागृह विभाग, पूर्व विभाग, नागपूर यांचे खुद्द कार्यालय व अधिनस्त कारागृंहाकरिता करण्यात आलेल्या संगणक व प्रिंटर, या उपकरणांच्या रु.४९,७४,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेच्या खरेदी खर्चास या शासन निर्णयान्वये कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

२. यावरील होणारा खर्च सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात मागणी क्र. बी-५, मुख्यलेखाशिर्ष २०५६ (तुरुंग) (००) (००) (००१), संचालन व प्रशासन (००) (०१) कारागृह निरीक्षणालय, (२०५६ ००२६), १७- संगणक खर्च या लेखाशिर्षाखालील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.४.२०१५ नुसार वित्तीय अधिकार नियम, १९७८ भाग पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र.२७ (अ) नियम ७६ मधील अटीस अधीन राहून प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२६/२०२४/व्यय-८, दिनांक ११.३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१२२५०६६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन पारीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या ओदशानुसार व नावांने,

SEEMA TUSHAR SAWANT

Digitally signed by SEEMA TUSHAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=15a6230fe20fd947aa83047f5deb85c95659ceb098e76eb25dd802b0518e7d63, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9ED89E6C00B3FD549E02FB85DFE0767F96018A29CCAC79EC62AAFD247DECECE8, cn=SEEMA TUSHAR SAWANT
Date: 2024.03.15 12:34:22 +05'30'

**( सीमा तु. सावंत )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (अ. व सु.) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग/पश्चिम विभाग/मध्य विभाग/दक्षिण विभाग, नाशिक विभाग,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा, मुंबई,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. निवड नस्ती, तुरुंग-२ कार्यासन, गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.